वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३.
प्रकल्प उभारणीसंदर्भात मार्गदर्शक सुचना.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: धोरण - २०२५ / प्र. क्र.०१ / टेक्स - ५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २२ एप्रिल, २०२५

वाचा:-

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०१७/प्र.क्र.६/टेक्स -५, दि.१५ फेब्रुवारी, २०१८.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०१९/प्र.क्र.१/टेक्स -५, दि.१६ जानेवारी, २०१९.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०२३/प्र.क्र.८१/टेक्स -५, दि.०२ जून, २०२३.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०२३/प्र.क्र.८१/टेक्स -५, दि.२८ ऑगस्ट, २०२४.

प्रस्तावना:-

संदर्भ क्र.३ येथील दि.०२ जून, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्याचे नवीन एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ जाहीर करण्यात आले आहे. सदर धोरणान्वये राज्यातील विविध वस्त्रोद्योग घटकांना भांडवली अनुदान देण्याच्या योजना जाहीर करण्यात आलेल्या आहेत. तसेच संदर्भ क्र.४ येथील दि.२८ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ अंतर्गत राज्यातील वस्त्रोद्योग प्रकल्पांना भांडवली अनुदान वितरीत करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. या धोरणाचा कालावधी दि.०२ जून, २०२३ ते दि.३१ मार्च, २०२८ असा आहे. या धोरणान्वये लागू करण्यात आलेली भांडवली अनुदान योजना ही एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ कालावधीत उत्पादनाखाली येणाऱ्या वस्त्रोद्योग प्रकल्पांसाठी तसेच अस्तित्वातील प्रकल्पांचे विस्तारीकरण आणि विविधीकरण यांच्यासाठी अनुज्ञेय आहे. बँक/वित्तीय संस्थांकडून कर्ज घेतलेले वस्त्रोद्योग प्रकल्प, अंशत: स्व-अर्थसहाय्यित किंवा पूर्णत: स्व-अर्थसहाय्यित वस्त्रोद्योग प्रकल्पांच्या स्थिर भांडवली गुंतवणुकीवर (पात्र संयंत्र व यंत्रसामुग्रीच्या एकूण मूळ किंमतीवर) भांडवली अनुदान अनुज्ञेय आहे.

तथापि, राज्यातील काही वस्त्रोद्योग घटकांनी वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ च्या कालावधीमध्ये (दि.०२ जून, २०२३ पूर्वी) प्रकल्पाची उभारणी सुरू केली होती, मात्र सदर प्रकल्प एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ च्या कालावधीत (दि.०२ जून, २०२३ रोजी वा त्यानंतर) उत्पादनाखाली आलेले आहेत. त्यामुळे दि.०२ जून, २०२३ रोजी वा त्यानंतर उत्पादनाखाली येणाऱ्या वस्त्रोद्योग प्रकल्पांना एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ अन्वये जाहीर करण्यात आलेली भांडवली अनुदान योजना लागू आहे. वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ च्या कालावधीमध्ये वस्त्रोद्योग घटकांनी प्रकल्पाची उभारणी सुरू केली असल्याने वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ अन्वये लागू असलेल्या व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान योजनेचे लाभ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

राज्यातील वस्त्रोद्योग घटकांना वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ अन्वये अनुज्ञेय असलेले व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान लागू करण्यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

२. ज्या वस्त्रोद्योग घटकांनी प्रकल्पाची उभारणी वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ च्या कालावधीमध्ये सुरु केली आहे मात्र सदर प्रकल्प एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ च्या कालावधीत (दि.०२ जून, २०२३ रोजी वा त्यानंतर) उत्पादनाखाली आलेले आहेत अशा वस्त्रोद्योग घटकांपैकी जे वस्त्रोद्योग घटक खालील बाबींची पूर्तता करतील त्या वस्त्रोद्योग घटकांना वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ अन्वये जाहीर करण्यात आलेली व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान योजना लागू करण्याचा निर्णय या शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे:-

१) ज्या वस्त्रोद्योग घटकांना वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ च्या कालावधीमध्ये बँक/वित्तीय संस्थेने कर्ज मंजूर केलेले आहे.
२) ज्या वस्त्रोद्योग घटकांनी वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ च्या कालावधीमध्ये स्व-अर्थसहाय्याने प्रकल्पाची उभारणी सुरू केली आहे आणि या वस्त्रोद्योग घटकांनी वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ च्या कालावधीमध्ये यंत्रसामुग्री खरेदीसाठी यंत्रनिर्मिती करणाऱ्या कंपनीस अग्रीम अदा केले आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०४२२१३००१९६५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SHRIKRISHNA
BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2025.04.22 13:01:54 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री तथा मंत्री (नगर विकास, गृहनिर्माण) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.उप मुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (सर्व) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्य मंत्री (सर्व) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.
८. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.
९. मा.खासदार (सर्व) महाराष्ट्र राज्य.
१०.मा.आमदार (सर्व) महाराष्ट्र राज्य.
११.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव (वस्त्रोद्योग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र- १, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
१५. महालेखापाल, (लेखापरिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
१६. आयुक्त (वस्त्रोद्योग ), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
१७. संचालक (रेशीम),रेशीम संचालनालय, नागपूर.
१८. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
१९.महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई.
२०. व्यवस्थापक, टफ्स सेल मधील सर्व बँका
२१. वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने.
२२.निवडनस्ती (कार्यासन टेक्स-५).